# महाराष्ट्र शासन

क्रमांक: बीयुडी.-१६२१/प्र.क्र.१२०/२८-अ
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १८ जानेवारी, २०२२.

**विषय :-** मिहान प्रकल्पाच्या विकासा करिता महाराष्ट्र विमानतळ कंपनीस अनुदान वितरीत करणेबाबत.

**वाचा :-** उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र.मविविकं/वित्त व लेखा/३८९, दि.१५.०७.२०२१.

**शासन ज्ञापन :-**

लेखाशीर्ष ३०५३ ०१७३ खाली ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अंतर्गत उपलब्ध तरतुदीतून मिहान प्रकल्पातील भूसंपादन, पुनर्वसन व १२% सानुग्रह अनुदान व भारतीय वायुदलाच्या मौजा जौयताळा येथील पोच रस्ता बांधकामासाठी तसेच दिवाणी न्यायालयातील कलम १८ व २८ खालील दाव्यांसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष ३०५३-०१७३ खाली रु.२६०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत केला आहे. आतापर्यंत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात या लेखाशीर्षाखाली महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस रु.३९.०० कोटी समक्रमांक दि.३०.०९.२०२१ च्या ज्ञापना अन्वये निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

२. आता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष ३०५३ ०१७३ खाली मिहान प्रकल्पातील भूसंपादन, पुनर्वसन व १२% सानुग्रह अनुदान व भारतीय वायुदलाच्या मौजा जयताळा येथील पोच रस्ता बांधकामासाठी तसेच दिवाणी न्यायालयातील कलम १८ व २८ खालील दाव्यांसाठी **रु.९१.०० कोटी** इतका निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. या अनुषंगाने मिहान प्रकल्पासाठी **रु.९१.०० कोटी** निधी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस उपलब्ध करुन देण्यासाठी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यात येत आहे.

**योजनेचे नाव- - मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमान चालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००) (०३) मिहान प्रकल्पाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१७३) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान**

| अ.क्र. | बाब | सन २०२१-२२ ची मूळ अर्थसंकल्पिय तरतूद | सन २०२१-२२ मध्ये आतापर्यंत वितरीत करण्यात आलेली रक्कम | आता वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १. | भूसंपादन | रु. २६०.०० कोटी | रु. ३९.०० कोटी | रु.२,१०,००,०००.०० |
| २. | मिहान प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन | | | रु.४३,८३,००,०००.०० |
| | १२.५% सानुग्रह अनुदान | | | ------ |
| | भारतीय वायुदलाच्या मौजा जयताळा येथील पोच रस्ता बांधकामासाठी | | | |
| ३. | दिवाणी न्यायालयातील वाढीव नुकसान भरपाई बाबतचे कलम १८ खालील दाखल दावे | | | रु.४१,०७,००,०००.०० |
| | दिवाणी न्यायालयातील कलम १८ नुसार वाढीव नुकसान भरपाई मिळण्याच्या अनुषंगाने कलम २८ करिता दाखल दावे | | | रु.४,००,००,०००.०० |
| एकूण | | रु. २६०.०० कोटी | रु. ३९.०० कोटी | रु. ९१,००,००,०००.०० |

(एकूण अक्षरी रक्कम रुपये एक्क्याण्णव कोटी फक्त)

३. मिहान प्रकल्पासाठी आता वितरीत करण्यात येणाऱ्या ९१.०० कोटी या रकमेचे वितरण पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | आता वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|
| १. | भूसंपादन | रु.२,१०,००,०००.०० |
| २. | मिहान प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन | रु.४३,८३,००,०००.०० |
| ३. | दिवाणी न्यायालयातील वाढीव नुकसान भरपाई बाबतचे कलम १८ खालील दाखल दावे | रु.४१,०७,००,०००.०० |
| ४. | दिवाणी न्यायालयातील कलम १८ नुसार वाढीव नुकसान भरपाई मिळण्याच्या अनुषंगाने कलम २८ करीता दाखल दावे | रु.४,००,००,०००.०० |
| **एकूण** | | रु. ९१,००,००,०००.०० |

**(एकूण अक्षरी रक्कम रुपये एक्क्याण्णव कोटी फक्त)**

४. उपरोक्त खर्च "**मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमान चालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००) (०३) मिहान प्रकल्पाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१७३) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान**" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

५. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो विहीत मुदतीत खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. याबाबतची जबाबदारी नियंत्रण अधिका-याची असेल. तसेच, खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत खर्चाचा आढावा वेळोवेळी शासनास सादर करण्यात यावा.

६. हे शासन ज्ञापन वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.६९७/२०२१/व्यय-४, दि.३०.१२.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. २०२२०११८११२९३१०९०७ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mahesh Kisan Wavhal

Digitally signed by Mahesh Kisan Wavhal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, serialNumber=495c75b4c173c81f308bd63a1b33a5da4ea131ed182d44ea1b502ab4662e9810, cn=Mahesh Kisan Wavhal
Date: 2022.01.18 11:32:53 +05'30'

**( महेश वाव्हळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
३. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
४. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

६. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-१४४३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, कार्या-व्यय ४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती.